भायखळा जिल्हा कारागृह येथील बरॅकीची दुरुस्ती,
स्वच्छतागृहे (स्नानगृहे/शौचालये) व पाण्याची पाईप
लाईन बसविणेसाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग,

**शासन निर्णय क्रमांक: बांधका २००३ /प्र.क्र. ३०४ /पीआरएस-२**

**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२. दिनांक : १६ डिसेंबर, २००३.**

वाचा : (१) शासन निर्णय गृह विभाग, क्र. बीएलडी/ १३९९/ १/ प्र. क्र. ५३ /पीआरएस-२,
दि. १५ जानेवारी २००२.

(२) कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), पुणे यांचे क्र. बीएलडी/ पाणी-पुरवठा -प्रसाधनगृह /
५७९/ १०६३७ /कक्ष-३ दि. १४/११/२००३ चे पत्र.

(३) शासन गृह विभाग पत्र क्र.एमआयएस-२००३/प्र.क्र.१६२/पीआरएस-२,दि.३ डिसें.२००३.

शासन निर्णय :- भायखळा जिल्हा कारागृह व मुंबई जिल्हा महिला कारागृह येथील बंद्यांसाठी मुंबई महानगरपालिकेमार्फत पुरवठा करण्यात येत असलेला पाणी पुरवठा अपुरा व कमी दाबाने होत असून सध्याच्या पाण्याच्या पाईप लाईन या जुन्या व काही ठिकाणी गंजल्यामुळे त्यांची वारंवार दुरुस्ती करावी लागत आहे. यामुळे पाणी दुषित होऊन बंद्यांच्या आरोग्यावर त्याचा परिणाम होत आहे. विशेषतः येथे नव्याने राज्यातील पहिले स्वतंत्र महिला कारागृह सुरु केले असल्याने महिला बंद्यांच्या पाणीपुरवठ्यावर याचा जादा ताण पडत असून कारागृह प्रशासनावर त्याचा विपरीत परिणाम होत आहे. याच अनुषंगाने मा. उच्च न्यायालयात रिट पिटीशन क्रमांक २८१५/२००३ अन्वये याचीका दाखल झालेली असून या संदर्भात तसेच इतर सुविधा पुरविणेबाबत मा. उच्च न्यायालयाने राज्य शासन करीत असलेल्या कार्यवाहीची माहिती देण्याबाबत सांगीतलेले आहे. या अनुषंगाने कारागृह महानिरीक्षक, पुणे यांनी या कारागृहासाठी मोठ्या व्यासाची जादा पाईप लाईन टाकणे. तसेच बरॅक क्र. ३ व ४ येथे बंद्यांच्या स्वच्छतागृहांची, ( शौचालये व स्नानगृहांची ) दुरुस्ती व नुतनीकरण व इतर अनुषंगिक बांधकामे करण्यासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांनी प्रमाणित केलेल्या

-/-

रु.४,९८,३९२/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रक व नकाशांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत विनंती केलेली आहे.

२. भायखळा जिल्हा कारागृहात दोन टेहळणी मनोऱ्याच्या बांधकामासाठी विभागाच्या वर नमूद दिनांक १५ जानेवारी २००३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली असून या कामाचा समावेश केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेच्या आराखड्यात केलेला आहे व त्याच निधीचे वितरण कारागृह महानिरीक्षणालय, पुणे यांचेकडून त्यांच्या क्रमांक बीएलडी/२०००/ ३०६८५/८८४७ / कक्ष-३, दिनांक २२.९.२००३ च्या आदेशान्वये संबंधीत कारागृहाकडे करण्यांत आलेले आहे. तथापि या कामाची ( टेहळणी मनोरे ) सध्या आवश्यकता नसल्याने हे काम रद्द करुन त्याबाबतचा निधी वर नमूद पाण्याची पाईप लाईन, बरॅकीची दुरुस्ती इत्यादी अत्यावश्यक कामासाठी देण्याबाबत व या कामाचा समावेश वरील केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा या योजनेतर योजनेच्या आराखड्यात करण्यासंदर्भात शासन स्तरावर कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई व सार्वजनिक बांधकाम विभागाचे अधिकारी यांचेसमवेत दिनांक २६ नोव्हेंबर २००३ रोजी झालेल्या आढावा बैठकीत निर्णय घेण्यांत आलेला आहे. त्या अनुषंगाने कारागृह महानिरीक्षणालय, पुणे यांनी हा निधी वर नमूद पाण्याची पाईप लाईन, बरॅकीची दुरुस्ती इत्यादी अत्यावश्यक कामासाठी देण्याबाबत उपरोक्त दिनांक १४/११/२००३ च्या प्रस्तावाव्दारे शासनास विनंती केलेली आहे.

३. भायखळा जिल्हा कारागृह व मुंबई जिल्हा महिला कारागृह येथील बंद्यांसाठी पाण्याची मोठ्या व्यासाची जादा पाईप लाईन टाकणे. तसेच बरॅक क्र. ३ व ४ येथे बंद्यांच्या स्वच्छतागृहाची, ( शौचालये व स्नानगृहांची ) दुरुस्ती व नुतनीकरण व इतर अनुषंगिक बांधकामे करणे या कामाचा समावेश केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा या योजनेतर योजनेच्या आराखड्यात करण्यात येत असून या अत्यावश्यक कामाचा काळजीपूर्वक विचार करुन शासन या कामासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने पाठविलेल्या रु. ४,९८,३९२/- ( रु. चार लाख अठ्ठ्याण्णव हजार तिनशे ब्याण्णव फक्त ) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता देत आहे. विभागाने यापूर्वी भायखळा जिल्हा कारागृहात दोन टेहळणी मनोऱ्याच्या बांधकामासाठी वर नमूद दिनांक १५ जानेवारी २००३ च्या शासन निर्णयान्वये दिलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यांत येत असून त्यासाठी कारागृह महानिरीक्षणालयाने त्यांच्या दिनांक

२२.९.२००३ च्या आदेशान्वये दिलेला निधी वर नमूद केलेल्या पाण्याची पाईप लाईन व बरॅकीची दुरुस्ती, नुतनीकरण या अत्यावश्यक कामासाठी खर्चाच्या मर्यादेत उपलब्ध करुन देण्यांत यावा. तथापि निधी उपलब्ध झाल्या नंतरच विहीत कार्यपध्दतीने बांधकाम हाती घेण्यांत यावे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक बी-५ , मुख्य लेखा शिर्ष " २०५६ तुरुंग, १०१- तुरुंग (००) (०१ ) कारागृह सुधारणा योजना ( २०५६ - ०१८- ९ )( केंद्र पुरस्कृत )( योजनेतर/दत्तमत) " या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सी. आर. १२१० /२००३/व्यय-८, दिनांक १६/१२/२००३ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने व मंजूरीने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( र. ना. माळी )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,
कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक,दक्षिण विभाग, मुंबई
अधीक्षक, मुंबई जिल्हा महिला कारागृह
अधीक्षक, भायखळा जिल्हा कारागृह.
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम, मंडळ मुंबई.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
उपअभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
सहाय्यक जलअभियंता, जलकामे, ई विभाग कार्यालय-१०, शेख हफीजुद्दीन मार्ग, भायखळा,मुंबई-८.
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा व परिक्षा ), मुंबई/ नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रा ,मुंबई.
वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग ( इमारत -२ ) मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव, वियुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती/ पीआरएस-२.